**प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणी संदर्भात सुधारित <u>मार्गदर्शन सूचना</u>**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन शुध्दीपत्रक क्र.ग्रापाधो-११११/प्र.क्र.९०/पापु ०७
**मंत्रालय,मुबई- ४०० ०३२, दि. ०४ जून, २०११**

**वाचा:-** शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/ पापु-०७, दि.१७ मार्च, २०१०

**प्रस्तावना:-**

संदर्भाधिन दि.१७ मार्च,२०१० च्या शासन निर्णयातील परि.३.३ अनुसार रु.५.०० कोटी पर्यंतच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी जिल्हा परिषदेमार्फत व रु.५.०० कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात येते अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत.

तथापि जिल्हा परिषदांकडे रु.५.०० कोटी पर्यंतच्या मोठ्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक असणारे पुरेसे तांत्रिक कौशल्य तसेच सक्षम तांत्रिक अधिकारी /कर्मचारी उपलब्ध नाहीत. त्यामुळे अशा योजनांची योग्य प्रकारे अंमलबजावणी होऊ शकत नाही. परिणामतः अशा योजनांमध्ये अनेक तांत्रिक दोष निर्माण होऊन त्या पुर्ण क्षमतेने कार्यान्वित होण्यास असमर्थ ठरतात.

महाराष्ट जीवन प्राधिकरणाकडे सक्षम तांत्रिक अधिकाऱ्यांचे पुरेसे मनुष्यबळ राज्य स्तरापासून जिल्हा पातळीपर्यंत उपलब्ध आहे, त्यामुळे जिल्हा परिषदांची मर्यादित तांत्रिक क्षमता विचारात घेता जिल्हा परिषदांकडे रु.३.०० कोटी पर्यंतच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्याची तर रु.३.०० कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन शुद्धिपत्रक:-**

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता संदर्भाधिन दि.१७ मार्च, २०१० च्या शासन निर्णयातील परिच्छेद ३.३ खालील प्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे:-

**परिच्छेद ३.३-** रु.३.०० कोटी पर्यंतच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी जिल्हा परिषदेने करावी. रु.३.०० कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या प्रादेशिक योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात यावी. योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पुर्ण झालेली आहे, हे पडताळण्यासाठी जिल्हा परिषदेने, रू. ३.०० कोटी पर्यंतच्या प्रादेशिक योजनांसाठी व महाराष्ट्र जीवन

प्राधिकरणाने, रु.३.०० कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांसाठी योजना पुर्ण झाल्यानंतर ठेकेदार किमान १ वर्ष ही योजना चालवेल अशी अट संबंधित ठेकेदाराशी करारनामा करताना करारनाम्यात घालावी. प्रादेशिक योजनांची देखभाल दुरुस्ती व व्यवस्थापन संबंधित ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांच्या शिखर समितीमार्फत रु.३.०० कोटी पर्यंतच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांसाठी जिल्हा परिषदांच्या सहाय्याने व रु.३.०० कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांसाठी मजीप्राच्या सहाय्याने करण्यात येईल.

सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०६०४१२५७३४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
**(प्रितमकुमार जावळे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,
मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्य मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
संचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,
मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषदा
सर्व अधिक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष
सर्व कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,
सर्व कार्यकारी अभियंता,ग्रामिण पाणी पुरवठा विभ ाग,जिल्हा परिषद
महालेखापाल,महाराष्ट्र - १ मुंबई(लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल,महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, नाशिक,पुणे,औरंगाबाद,अमरावती व नागपूर
सर्व प्रादेशिक उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,
सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य अभियंता,भारत निर्माण कक्ष,नवी मुंबई
सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व गट विकास अधिकारी,पंचायती समिती
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवड नस्ती,पापु-०७